**आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत समर्पित अथवा अखर्चित राहिलेला निधी उपलब्ध करुन देण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. : स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ डिसेंबर, २०२१

**वाचा :** नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२.७.२०१६

**प्रस्तावना:-**

आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत संबंधित आर्थिक वर्षासाठी शासनाने मंजूर केलेल्या निधीमधून झालेला खर्च वजा जाता वर्षअखेर शिल्लक निधी समर्पित केला जातो. दरवर्षी अनुज्ञेय असलेल्या निधीमधून ज्या कामांची प्रशासकीय मान्यता झालेली असते, परंतु कामे कार्यान्वीत /पूर्ण झालेली नसतात, अशा कामांचा निधी पुढील आर्थिक वर्षात पुन्हा उपलब्ध करुन देण्याची मागणी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून नियोजन विभागाकडे केली जाते. त्यासाठी दरवर्षी पूरक मागणीद्वारे निधी उपलब्ध करुन घेऊन समर्पित निधी उपलब्ध करुन देण्यात येतो आणि वर्षअखेर खर्ची न पडलेला निधी पुन्हा समर्पित करण्यात येतो. यामुळे आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत घेण्यात आलेली पूरक मागणी निष्फळ ठरल्याचा आक्षेप दरवर्षी महालेखापाल कार्यालयाकडून घेतला जातो. यास्तव, आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्षामध्ये मंजूर निधीमधून स्पीलचा निधी वजा जाता शिल्लक निधीतून गत वर्षात प्रशासकीय मान्यता दिलेल्या ज्या कामांचा निधी ती कामे कार्यान्वीत/पूर्ण न झाल्यामुळे समर्पित करण्यात आला होता अशा कामांपैकी जी कामे पूर्ण झाली असतील अशा कामांची देयके चालू वर्षाच्या निधीमधून भागविण्याबाबत सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत संबंधित आर्थिक वर्षाकरीता नियोजन विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीमधून विधीमंडळ सदस्यांनी सुचविलेली कामे ज्या कार्यान्वयीन यंत्रणेकडून पूर्ण करण्यात येणार आहेत, त्या यंत्रणेकडून अंदाजपत्रक व तांत्रिक मंजूरी प्राप्त झाल्यानंतर जिल्हाधिकारी यांचेकडून प्रशासकीय मान्यता प्रदान करुन निधी वितरीत केला जातो. या प्रक्रियेमध्ये बराच कालापव्यय होत असल्याने आर्थिक वर्षाच्या सुरुवातीच्या ३-४ महिन्यांमध्ये अत्यल्प प्रमाणात खर्च होतो. ही बाब विचारात घेऊन आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सबंधित आर्थिक वर्षाकरिता नियोजन विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी आर्थिक वर्षामध्ये खर्च करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

२. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत विधीमंडळ सदस्यांच्या कार्यकालातील प्रथम आर्थिक वर्षासाठी अनुज्ञेय असलेल्या निधीच्या दीड पटीमध्ये व तद्नंतर स्पील वजा जाता शिल्लक रकमेच्या दीड

पटीत आणि विधीमंडळ सदस्यांच्या कार्यकालाच्या शेवटच्या वर्षात शिल्लक रकमेच्या एक पटीतच कामे मंजूर करण्याची तरतूद पूर्वीप्रमाणेच लागू राहील. तथापि, याबाबतीत कार्यप्रणालीमध्ये अधिक सुस्पष्टता असावी याकरीता खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहे :-

२.१ **समर्पित झालेल्या निधीबाबत करावयाची कार्यवाही :** आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत प्रत्येक आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या निधीतून प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या परंतू त्या आर्थिक वर्षामध्ये दि.३१ मार्च अखेरपर्यंत खर्च न झालेल्या पर्यायाने शासनास समर्पित झालेल्या निधी बाबतची माहिती नियोजन विभागास सर्व जिल्हाधिकारी यांनी **"विवरणपत्र- अ"** मध्ये पुढील आर्थिक वर्षात दि.३० एप्रिल पर्यंत सादर करावी.

२.२ **स्पील मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीबाबत करावयाची कार्यवाही :** आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या निधीतून प्रथमत: स्पीलच्या कामांची अर्थात गत आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या कामांची प्रगती पाहून निधी उपलब्ध करुन द्यावा. तद्नंतर गत आर्थिक वर्षात प्रशासकीय मान्यता दिलेल्या ज्या कामांचा निधी समर्पित करण्यात आला होता, अशा पूर्ण झालेल्या कामांची देयके भागविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. अशा निधीचा हिशोब विधीमंडळ सदस्यनिहाय स्वतंत्रपणे ठेवावा व पुरवणी मागणीद्वारे "अतिरिक्त निधी"उपलब्ध होण्याकरीता विधीमंडळ सदस्यनिहाय एकत्रित माहिती सोबतच्या **विवरणपत्र "ब"** मध्ये नियोजन विभागास प्रत्येक वर्षामध्ये दि. ३१ ऑगस्ट पर्यंत सादर करावी.

२.३ **अखर्चित राहिलेल्या निधीबाबत करावयाची कार्यवाही :** आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत जिल्हाधिकारी यांनी स्थानिक स्वराज्य संस्थांना मंजूर केलेला निधी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि. ६.६.२००८ अन्वये पुढील आर्थिक वर्षअखेर खर्च करण्याची मुभा आहे. तथापि, काही अपरिहार्य कारणास्तव पुढील आर्थिक वर्ष अखेरपर्यंत मुदतवाढीच्या कालावधीत पूर्ण न झाल्यास त्या आर्थिक वर्षाअखेर अखर्चित निधी शासनखाती जमा करावा. तथापि, असे काम पूर्ण करण्याकरीता निधी उपलब्ध होण्याकरीता जिल्हाधिकारी यांनी त्या आर्थिक वर्षात कार्यान्वयीन यंत्रणानिहाय आढावा घ्यावा व उपलब्ध असलेल्या निधीतून कामे पूर्ण करुन घ्यावीत. अशा कामांची विधीमंडळ सदस्यनिहाय माहिती जिल्हाधिकारी यांनी **विवरणपत्र "क"** मध्ये आपल्या स्तरावर ठेवावी. स्थानिक स्वराज्य संस्थांकडे अशा कामांकरीता **अखर्चित निधी खर्च करण्यास परवानगी देण्याबाबतचे प्रस्ताव शासनाकडे सादर करण्यात येऊ नयेत.**

३. **आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत एकापेक्षा अधिक जिल्ह्यात कार्यक्षेत्र असलेल्या विधीमंडळ सदस्यांच्या निधीबाबत करावयाची कार्यवाही :** ज्या विधीमंडळ सदस्यांचे कार्यक्षेत्र एकापेक्षा अधिक जिल्ह्यात आहे अशा विधीमंडळ सदस्यांनी सुचविलेल्या कामांकरीता वितरीत करण्यात आलेला निधी व त्या अनुषंगाने प्रत्यक्ष खर्च, समर्पित निधी व अखर्चित निधी याबाबतचा संपूर्ण हिशोब " नोडल जिल्ह्यांनी " (Nodal Districts) ठेवावयाचा आहे. त्यानुसार कार्यान्वयीन जिल्हयांनी (Implementing

District) समर्पित निधीची मागणी वरील कार्यपध्दतीनुसार “नोडल जिल्ह्याला” (Nodal Districts) करणे आवश्यक राहील. कोणत्याही परिस्थितीत कार्यान्वयीन जिल्ह्यानी (Implementing District) शासनाकडे समर्पित निधीची पुरवणी मागणी करु नये.

४. वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौसं. क्र.५१२/२०२१/व्यय-८, दि. ३/१२/२०२१ अन्वये हे शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हे शासन परिपत्रक उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक २०२११२१६१६४८१८९११६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJEEV
HARISHCHANDRA
DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36,
pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D,
serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2021.12.16 16:49:36 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत अग्रेषित,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व ), मंत्रालय, मुंबई
५) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
७) विभागीय आयुक्त, (सर्व),
८) जिल्हाधिकारी, (सर्व),
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१०) नियोजन विभागातील सहसचिव/उपसचिव, (सर्व)
११) उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांची कार्यालये, (सर्व)
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३) जिल्हा नियोजन अधिकारी, (सर्व)
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१५) वित्त विभाग, (का. व्यय-८/अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती/का-१४८२, मंत्रालय, मुंबई.

**शासन परिपत्रक क्र. : स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६ /का.१४८२ दि. १६ डिसेंबर, २०२१ चे सहपत्र**

**“विवरणपत्र-अ”**

| अ. क्र | विधानमंडळ सदस्याचे नाव | आर्थिक वर्षात शासनाकडून प्राप्त निधी | प्राप्त निधीमधून झालेला खर्च | वर्षअखेर समर्पित केलेला निधी | समर्पित निधीपैकी पुढील आर्थिक वर्षात आवश्यक निधी | निधी समर्पित होण्याची कारणे |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

**“विवरणपत्र-ब”**

| अ. क्र. | विधीमंडळ सदस्याचे नांव | मतदारसंघ | आर्थिक वर्षामध्ये शासनाने मंजूर केलेला निधी | गतवर्षीचा स्पीलचा निधी | स्पील वजा जाता शिल्लक निधी | शिल्लक निधीमधून गत वर्षामध्ये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांसाठी मंजूर केलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| | | | | | | |

**“विवरणपत्र-क” (जिल्हास्तरावर ठेवावयाचे)**

| अ. क्र. | विधीमंडळ सदस्याचे नांव | मतदार संघ | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता दिनांक व रक्कम (प्रत जोडावी) | काम पूर्ण न होण्याची कारणे | रक्कम शासनखाती जमा केलेल्या चलनाचा तपशील (चलनाची प्रत जोडावी. |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |